सन २०११-१२ या आर्थिक वर्षात शुभमंगल सामुहिक विवाह योजनेअंतर्गत अनुदान वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०११/प्र.क्र.२१३/का-२
नवीन प्रशासन भवन, ३रा मजला,
मादम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ७ सप्टेंबर, २०११.

**वाचा :** शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अंदाज-२०११/प्र.क्र.९३/२०११/अर्थसंकल्प-३, दि.६.५.२०११.

**शासन निर्णय** :- सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षाकरीता शुभमंगल सामुहिक विवाह योजनेअंतर्गत (Plan) रु.१४,७०,००,०००/- इतकी तरतूद करण्यात आली आहे. या तरतूदीपैकी फक्त रु.१०,००,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) इतकी रक्कम कोषागारातून आहरित करण्यास वित्त विभागाने सहमती दिली आहे. सदर बाब लक्षात घेता रु.१४.७० कोटी इतक्या निधी पैकी वित्त विभागाच्या सहमतीनुसार रु.१०,००,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) इतकी तरतूद वितरीत करण्यास या निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधीचे नियंत्रण करण्यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे व संबंधीत जिल्ह्याचे जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. रु.१०,००,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) इतक्या खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे, व सन २०१०-११ मधील बऱ्याच जिल्ह्यात थकबाकी आहे, ती सन २०१०-११ ची थकबाकी विचारात घेवून कोणत्याही जिल्ह्यात थकबाकीच्या किमान ५०% पेक्षा कमी वितरीत केली जाणार नाही, याची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास विभाग, पुणे यांनी घ्यावी. तसेच सदर रक्कम मागणी क्र.एक्स-१, योजनांतर्गत २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, १०३-महिलाकल्याण, २२-स्वयंसेवी संस्थांना विवाह भत्ता, (२२)(०१) शेतकऱ्यांच्या मुलींच्या शुभमंगल सामुहिक विवाह योजनेकरीता (विवाह भत्ता देण्यासाठी) स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान (२२३५-३२०१), ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली सन २०११-२०१२ मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावा.

३.	हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/१०.८०/प्र.क्र.७०/२००८/विनिमय, दिनांक १५.५.२००९ भाग पहिला, उपविभाग-३ / परिच्छेद २७(२)(ब) अन्वये विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.४८४/११/व्यय-६, दिनांक २४.८.२०११ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

( शं.शा.पढाळ )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर / मुंबई उपनगर.
वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,
नियोजन विभाग, मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई.
वित्त विभाग (व्यय-६), (अर्थसंकल्प-६), मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव/कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/का-४), महिला व बाल विकास विभाग, मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई
सर्व अधिकारी, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई,
निवडनस्ती (का.२)